**योजनाअंतर्गत योजनांच्या खर्चाची माहिती संकलित**
**<u>करुन घेण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत</u>**

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक : समिती-२०१०/प्र.क्र.७७/का. १४१२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० सप्टेंबर, २०१०

**शासन निर्णय**

मा.मुख्य सचिव हे दरमहा योजनातंर्गत खर्चाच्या प्रगतीचा आढावा घेत आहेत. या आढाव्यासाठी विस्तृत स्वरुपात योजनातंर्गत नियतव्यय, अर्थसंकल्पित तरतूद, वितरीत निधी व खर्चाची माहिती उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. नियोजन विभागातून ही माहिती उपलब्ध करुन दिली जाते. तथापि, काही प्रमाणात विभागाच्या व नियोजन विभागाच्या माहितीमध्ये तफावत दिसून येते. ही माहिती शक्य तो अचूक संकलित व्हावी यासाठी खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | सह सचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग. | अध्यक्ष |
| २) | उप सचिव ( वार्षिक योजना), नियोजन विभाग | सदस्य |
| ३) | उप सचिव (र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, | सदस्य |
| ४) | सह संचालक (इ.आ.स.) अर्थ व सांख्यिकी संचालनालयास | सदस्य |
| ५) | अवर सचिव (वार्षिक योजना), नियोजन विभाग | सदस्य सचिव |

तसेच सर्व प्रशासकीय विभागाच्या सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प) यांना आवश्यकतेनुसार समितीच्या बैठकीमध्ये आमंत्रित करण्यात येईल.

२. सदर समितीने केंद्र पुरस्कृत योजना, ४० फ्लॅगशीप योजना, योजनातंर्गत योजना, २० कलमी कार्यक्रम तसेच मराठवाडा पॅकेज, विदर्भ पॅकेज , कोकण पॅकेज, नाशिक पॅकेज मधील योजनावरील खर्चाची माहिती एकत्रित करावी व संकलित माहिती प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यत मा. मुख्य सचिव व मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव यांना सादर करावी

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९३०१९०११७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

( अं.अ.कारखानीस )
उप सचिव ,महाराष्ट्र शासन

प्रत:

१) मा.मुख्य सचिव
२) मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव
३) प्रधान सचिव (वित्त)
४) प्रधान सचिव (नियोजन)
५) प्रधान सचिव (सा.प्र.वि.)
६) सर्व विभागाचे अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव
७) नियोजन विभागातील सर्व सह सचिव /उप सचिव
८) संचालक , अर्थ व सांख्यिकी संचालनालयास ,मुंबई
९) सह संचालक (इ.आ.स.) अर्थ व सांख्यिकी संचालनालयास ,मुंबई

१०) निवड नस्ती- का-१४१२